विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन)
एक अधिसंख्य पद निर्माण
करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२१/प्र.क्र.८५/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०८ डिसेंबर, २०२१

**संदर्भ:-** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०७/१६/आ.पु.क. दि.२७ जानेवारी, २०१७
२) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. सअअ (मुं) /परिमंडळ/ का-७/२०२१/७८५४ दि. २० ऑक्टोबर, २०२१
३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. सअअ (मुं) /परिमंडळ/ का-७/२०२१/८७४५ दि. ०१ डिसेंबर, २०२१

**प्रस्तावना :-**

महालेखाकार (लेखा व हकदारी)-II, महाराष्ट्र, नागपूर यांच्या कार्यालयात श्री.स्वप्निल दिलीप गजभिये, विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) यांची नव्याने नियुक्ती करण्यात आली आहे. श्री.स्वप्निल गजभिये, विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) यांना वेतन व भत्ते अदा करण्यासाठी विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) एक पद सेवार्थ प्रणालीमध्ये नव्याने समाविष्ट करण्यासाठी विभागीय लेखापालाचे एक अधिसंख्य पद परिविक्षाधीन कालावधीकरिता निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र, नागपूर या कार्यालयाकडील श्री.स्वप्निल दिलीप गजभिये, विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) यांना वेतन मिळण्याच्या दृष्टीने विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) (वेतनश्रेणी रुपये ३५,४००-१,१२,४०० सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशींनुसार) यांचे एक अधिसंख्य पद परिविक्षाधीन कालावधीकरिता निर्माण करण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. श्री.स्वप्निल गजभिये हे दि.१५ जुलै, २०२० (म.पू.) पासून शासन सेवेत रुजू झाले आहेत. तद्नंतर प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी) कार्यालय, ओरीसा, पुरी शाखा यांच्या दि.१९ जुलै, २०२१ च्या आदेशान्वये श्री.गजभिये यांची बदली प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी)-II कार्यालय, महाराष्ट्र, नागपूर यांच्या कार्यालयात करण्यात आली असून, सदर कार्यालयात ते दि.२३ जुलै, २०२१ (म.नं.) रुजू झाले आहेत. श्री.गजभिये यांचा परिविक्षाधीन कालावधी दि.१४ जुलै, २०२२ (म.नं.) रोजी समाप्त होत आहे. यास्तव श्री.गजभिये यांच्याकरीता विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) हे अधिसंख्य पद दि.२३ जुलै, २०२१

ते दि.१४ जुलै, २०२२ या कालावधीसाठी निर्माण करण्यात येत आहे. श्री.गजभिये यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त झाल्याच्या दिनांकानंतरच्या दिनांकास म्हणजे दि.१५ जुलै, २०२२ पासून सदर अधिसंख्य पद आपोआप संपुष्टात येईल.

३. या बाबीवरील खर्च -मागणी क्र. एच-०६, २०५९ सार्वजनिक बांधकामे, ८० सर्वसाधारण , ००१- संचालन व प्रशासन (योजनेतर) (०८), कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई (०८) (०२) कार्यान्वयन (२०५९-१२४५)॰ या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६ /प्र.क्र.७/१६/आ.पु.क. दि.२७ जानेवारी, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११२०८१७३४४४४४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2021.12.08 17:49:11 +05'30'

**( वि. नि. ढमाळ )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
२. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
६. महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
९. सर्व सह सचिव /उप सचिव / अवर सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११. अधिदान व लेखा अधिकारी, वान्द्रे (पूर्व), मुंबई.
१२. जिल्हा कोषागार / उपकोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१३. वित्त विभाग (कार्यासन व्यय-११/ आकृतिबंध पुनर्रचना कक्ष), मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन सेवा-४/अर्थसंकल्प-३, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. कार्यासन प्रशासन-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, (निवडनस्ती).

**प्रपत्र अ**

**शासन निर्णय क्र. ईसटी-२०२१/प्र.क्र.८५/प्रशासन-१**
**दि. ०८ डिसेंबर, २०२१ च्या सोबतचे प्रपत्र**

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | नियुक्ती आदेशाचा दिनांक | शासन सेवेत रूजू होण्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाप्त होण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | स्वप्निल दिलीप गजभिये | १६/०३/२०२० | १५/०७/२०२० (म.पू.) | १४/०७/२०२२ |